औद्योगिक प्रयोजनाकरिता मंजूर केलेल्या शासकीय जमिनीचा वापर (नझूल जमिनी वगळून) त्या प्रयोजना ऐवजी अन्य प्रयोजनासाठी करण्यास परवानगी देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः जमीन-२०१९/प्र.क्र.०१/ज-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**दिनांक: १८ फेब्रुवारी, २०१९**

वाचा :-

१. महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनीची विल्हेवाट करणे) नियम, १९७१
२. शासन निर्णय क्र. जमीन ०१/२०१३/प्र.क्र.२६/ज-१, दि. १५/०४/२०१७
३. शासन निर्णय क्र. जमीन ०५/२०१७/प्र.क्र.१४१/ज-१, दि. ०७/०९/२०१७
४. शासन निर्णय क्र. संकिर्ण-०१/२०१७/प्र.क्र.११/अ-२, दि. ११/०१/२०१८

प्रस्तावना :-

महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ आणि महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमिनींची विल्हेवाट करणे) नियम, १९७१ मधील तरतूदी अन्वये किंवा तत्पूर्वी शासकीय जमीन विहित अटी व शर्तीच्या अधीन राहून कब्जेहक्काने अथवा भाडेपट्टयाने औद्योगिक प्रयोजनासाठी प्रदान करण्यात आल्या / येत आहेत. मुंबई शहर व मुंबई उपनगर जिल्ह्यामध्ये सदर संहिता अस्तित्वात येण्यापूर्वी देखील अनेक शासकीय जमिनी भाडेपट्टयाने औद्योगिक प्रयोजनांसाठी प्रदान करण्यात आलेल्या आहेत.

महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ३७अ मध्ये, शासनाने प्रदान केलेल्या शासकीय जमिनीच्या वापरात बदल करण्यास राज्य शासनाची पूर्व संमती आवश्यक असल्याबाबत तरतूद करण्यात आलेली आहे. त्यामुळे प्रदान केलेल्या शासकीय जमिनीच्या वापरात बदल करण्यास परवानगी देण्यासाठी अधिमूल्य अथवा शुल्क आकारणे ही बाब विधीसंमत आहे.

औद्योगिक प्रयोजनासाठी प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनी, संबंधित घटकाने औद्योगिक प्रयोजनासाठी वापरात आणल्यानंतर, कालौघात अशा जमिनी अनेक ठिकाणी शहरी भागात समाविष्ट झालेल्या आहेत आणि त्या ठिकाणी आता औद्योगिक वापर करणे शहरीकरणामुळे शक्य होत नाही किंवा अशा जमिनीवर विकास आराखड्यानुसार/ विकास नियंत्रण नियमावलीनुसार अन्य वापर अनुज्ञेय करण्यात आला आहे. अशा ठिकाणी असलेल्या जमिनींच्या वापरात विकास आराखड्यातील वापराशी सुसंगत बदल करण्यासाठी मान्यता देण्याबाबत शासनाकडे अनेकदा विचारणा करण्यात येते. तथापि, प्रदान केलेल्या शासकीय

जमिनीच्या वापराच्या प्रयोजनातील बदलास अधिमूल्य अथवा शुल्क आकारुन परवानगी देणे याविषयीचे कोणतेही विवक्षित धोरण नसल्यास अशा प्रदान केलेल्या शासकीय जमिनींच्या वापरात बदल करण्यानुषंगिक प्राप्त प्रस्तावास मान्यता देणे अडचणीचे ठरते. या पार्श्वभूमीवर, अशा जमिनी विकास प्रक्रियेत सामावून घेण्याच्या दृष्टिने याबाबतचे धोरण निश्चित करणे गरजेचे झाले होते. यास्तव औद्योगिक प्रयोजनासाठी ज्या शासकीय जमिनी पूर्ण बाजारमूल्य आकारुन किंवा सवलतीच्या दराने प्रदान करण्यात आलेल्या आहेत, अशा जमिनीच्या औद्योगिक वापराऐवजी निवासी अथवा वाणिज्यिक वापर याप्रमाणे वापरात बदल करण्यासाठी अधिमूल्य आकारुन परवानगी देण्याबाबतचे धोरण संदर्भीय क्र. २ वरील शासन निर्णय क्र. जमीन ०१/२०१३/प्र.क्र.२६/ज-१, दि. १५/०४/२०१७ निश्चित करण्यात आले आहे.

त्याचप्रमाणे औद्योगिक, प्रयोजनासाठी ज्या शासकीय जमिनी (नझूल जमिनी वगळून) प्रदान करण्यात आलेल्या आहेत, अशा जमिनीच्या औद्योगिक वापराऐवजी शैक्षणिक किंवा रुग्णालय विषयक किंवा अन्य धर्मादाय प्रयोजनार्थ वापर याप्रमाणे वापरात बदल करण्यासाठी अधिमूल्य आकारुन परवानगी देण्याबाबतचे धोरण संदर्भीय क्र. ३ वरील शासन निर्णय क्र. जमीन ०५/२०१७/प्र.क्र.१४१/ज-१, दि. ०७/०९/२०१७ अन्वये निश्चित करण्यात आले आहे.

संदर्भाधीन अ.क्र.२ व अ.क्र.३ येथील शासन निर्णयानंतर संदर्भीय अ.क्र.४ येथील शासन निर्णयान्वये औद्योगिक घटकांसाठी संपादित करण्यात आलेल्या जमिनींच्या विक्री/वापरातील बदलाच्या अनुषंगाने सर्वंकष धोरण निश्चित करण्यात आले आहे.

संदर्भीय क्र. २, ३ व ४ येथील शासन निर्णयांन्वये प्रदान केलेल्या शासकीय जमिनीच्या किंवा औद्योगिक घटकांना संपदित करुन देण्यात आलेल्या जमिनींच्या वापरातील बदल/ हस्तांतरणाच्या प्रस्तावांवर कार्यवाही करतांना या धोरणांमधील वापरातील बदलाच्या पात्रतेच्या अटींमध्ये समानता नसल्याने अंमलबजावणीस समस्या येत असल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. काही औद्योगिक घटकांकडे शासनाने औद्योगिक प्रयोजनाकरीता प्रदान केलेल्या व शासनाने संपादित करुन दिलेल्या जमिनी असून अशा जमिनींचा अन्य प्रयोजनासाठी वापर प्रस्तावित करतांना या वापरातील बदलाबाबतच्या पात्रतेच्या अटी/शर्ती विभिन्न असल्याने असा वापरातील बदल प्रत्यक्षात आणण्यात अडचणी येत आहेत. त्यामुळे औद्योगिक घटकांना शासनाने औद्योगिक प्रयोजनासाठी प्रदान केलेल्या व संपादित करुन दिलेल्या जमिनींच्या वापरातील बदलाबाबतचे धोरण सुसंगत असणे आवश्यक असल्याने संदर्भाधीन शासन निर्णय क्र.जमीन-०१/२०१३/ प्र.क्र.२६/ ज-१, दि.१५/०४/२०१७व शासन निर्णय क्र. जमीन-०५/२०१७/ प्र.क्र.१४१/ ज-१, दि. ०७/ ०९/ २०१७ अधिक्रमित करुन औद्योगिक घटकांना औद्योगिक प्रयोजनासाठी प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनीच्या रहिवास/वाणिज्यिक किंवा शैक्षणिक किंवा रुग्णालय विषयक किंवा अन्य धर्मादाय प्रयोजनासाठी वापर करण्यास परवानगी देण्याकामी शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

१) संदर्भाधीन शासन निर्णय क्र. जमीन-०१/२०१३/प्र.क्र.२६/ज-१, दि. १५/०४/२०१७ तसेच शासन निर्णय क्र. जमीन- ०५/२०१७/प्र.क्र.१४१/ज-१, दि. ०७/०९/२०१७ अधिक्रमित करण्यात येत आहेत.

२) औद्योगिक घटकांना औद्योगिक प्रयोजनाकरीता प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनींच्या वापरात रहिवास/ वाणिज्यिक किंवा शैक्षणिक किंवा रुग्णालय विषयक किंवा अन्य धर्मादाय प्रयोजनासाठी वापरात बदल करण्यास महाराष्ट्र जमीन महसूल संहितेच्या कलम ३७अ अंतर्गत असलेल्या तरतुदींच्या अनुषंगाने खालील प्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत:-

२.१ औद्योगिक घटकांना औद्योगिक प्रयोजनासाठी प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनीच्या वापरात बदल करण्यास परवानगी देण्यापूर्वी, अशा जमिनीचा मूळ प्रयोजनासाठी वापर सुरु झाला असणे व जमीन प्रदान केल्यापासून ***किमान १० वर्षाचा कालावधी पूर्ण झालेला*** असणे अनिवार्य राहील. त्याचप्रमाणे, अशा जमिनीचा प्रस्तावित औद्योगिकेतर वापर प्रादेशिक नियोजनानुसार किंवा विकास आराखडयानुसार, तसेच विकास नियंत्रण नियमावलीनुसार व अन्य वैधानिक / प्रशासकीय तरतूदीनुसार अनुज्ञेय असणे आवश्यक असेल.

२.२ औद्योगिक घटकांना औद्योगिक प्रयोजनार्थ प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनीच्या वापरात बदल करण्यासंबंधी प्रस्तावांचा विचार करतांना, संबंधित शासकीय जमीन केंद्र अथवा राज्य शासनाच्या विविध मंत्रालय / विभाग किंवा त्यांच्या अधिनस्त निमशासकीय संस्थांना आवश्यक असल्यासंबंधी मागणी जिल्हाधिकारी कार्यालयात प्राप्त झालेली आहे किंवा कसे या बाबींची खातरजमा जिल्हाधिकारी यांनी करणे आवश्यक राहील. अशा खात्रीनंतर संबंधित शासकीय जमीन सार्वजनिक प्रयोजनार्थ आवश्यक असल्याचे निष्पन्न होत असल्यास, त्या प्रकरणी वापरात बदल करण्यास परवानगी न देता अशी शासकीय जमीन शासनाकडे परत घेण्याच्या दृष्टीने नियमानुसार कार्यवाही जिल्हाधिकारी यांच्या स्तरावरून प्रस्तावित करण्यात यावी.

२.३ (अ) औद्योगिक घटकांना औद्योगिक प्रयोजनासाठी **पुर्ण बाजारमुल्य वसूल करुन कब्जेहक्काने** प्रदान केलेल्या शासकीय जमिनीच्या वापराच्या प्रयोजनात बदल करून अशा जमिनीच्या **निवासी/वाणिज्यिक** प्रयोजनासाठीच्या वापरास परवानगी देतांना अशा जमिनीच्या त्या प्रयोजनासाठीच्या प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रानुसार येणा-या किंमतीच्या **२५%** इतकी रक्कम 'अधिमूल्य' म्हणून वसूल करून अश्या वापरातील बदलास परवानगी देण्यात यावी. मात्र असा वापरातील बदल संबंधित औद्योगिक घटकाने **विना परवानगी** केला असेल व अन्य शर्तभंग नसतील तर अशा विना परवानगी केलेला वापरातील बदल अशा जमिनीच्या त्या प्रयोजनाच्या प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रानुसार येणा-या किंमतीच्या **३७.५%**इतकी रक्कम एकत्रितात अधिमूल्य म्हणून वसूल करून नियमित करण्यात यावा. तसेच अशा जमिनीबाबत वापरातील बदलासह

अन्य स्वरुपाचे शर्तभंग असल्यास असे अन्य शर्तभंग प्रथमतः **प्रचलित तरतूदींप्रमाणे** नियमित करून तदनंतरच वरील प्रमाणे वापरातील बदल नियमित करण्यात यावा.

**(ब)** **पूर्ण बाजारमूल्य वसुल करुन** औद्योगिक घटकांना औद्योगिक प्रयोजनासाठी **कब्जेहक्काने** प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनीचा **शैक्षणिक किंवा रूग्णालय विषयक किंवा अन्य धर्मादाय प्रयोजनाकरिता** वापरातील बदलास परवानगी देतांना अशा जमिनीच्या त्या प्रयोजनासाठीच्या प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रानुसार येणा-या किंमतीच्या **१२.५%** इतकी रक्कम 'अधिमूल्य' म्हणून वसूल करून अशा वापरातील बदलास परवानगी देण्यात यावी. मात्र असा वापरातील बदल संबंधित औद्योगिक घटकाने **विनापरवानगी** केला असेल व अन्य शर्तभंग नसतील तर असा विनापरवानगी केलेला वापरातील बदल अशा जमिनीच्या त्या प्रयोजनाच्या प्रचलित वार्षिकदर विवरणपत्रानुसार येणा-या किंमतीच्या **२५%** इतकी रक्कम एकत्रितात अधिमूल्य म्हणून वसूल करून नियमित करण्यात यावा. तसेच अशा जमिनीबाबत वापरातील बदलासह अन्य स्वरूपाचे शर्तभंग असल्यास असे अन्य शर्तभंग प्रथमतः **प्रचलित तरतूदींनुसार** नियमित करून तद्नंतरच वरीलप्रमाणे वापरातील बदल नियमित करण्यात यावा.

**२.४ (अ)** औद्योगिक घटकांना औद्योगिक प्रयोजनासाठी शासनाने **सवलतीच्या दराने कब्जेहक्कावर** प्रदान केलेल्या शासकीय जमिनींच्या वापरात **निवासी/वाणिज्यिक** प्रयोजनाकरिता बदल करण्यास परवानगी देतांना अशा प्रयोजनासाठी संबंधित जमिनीच्या प्रचलित वार्षिकदर विवरणपत्रानुसार होणा-या किंमतीच्या **५०%** एवढे अधिमूल्य आकारण्यात यावे. मात्र असा वापरातील बदल संबंधित औद्योगिक घटकाने **विनापरवानगी** केला असेल व अन्य शर्तभंग नसतील तर असा विनापरवानगी केलेला वापरातील बदल अशा जमिनीच्या त्या प्रयोजनासाठी प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रानुसार होणा-या किंमतीच्या **६२.५%** रक्कम एकत्रितात अधिमूल्य म्हणून आकारुन नियमित करण्यात यावा. तसेच अशा जमिनीबाबत वापरातील बदलासह अन्य स्वरूपाचे शर्तभंग असल्यास असे अन्य शर्तभंग प्रथमतः प्रचलित तरतूदींप्रमाणे नियमित करून तद्नंतरच वरील प्रमाणे वापरातील बदल नियमित करण्यात यावा.

**(ब)** औद्योगिक घटकांना औद्योगिक प्रयोजनासाठी शासनाने **सवलतीच्या दराने कब्जेहक्कावर** प्रदान केलेल्या शासकीय जमिनीच्या वापरात **शैक्षणिक किंवा रूग्णालय विषयक किंवा अन्य धर्मादाय प्रयोजनासाठी** बदल करण्यास परवानगी देतांना अशा प्रयोजनासाठी संबंधित जमिनीच्या प्रचलित वार्षिकदर विवरणपत्रानुसार होणा-या किंमतीच्या **२५%** एवढी रक्कम अधिमूल्य म्हणून आकारण्यात यावी. मात्र असा वापरातील बदल संबंधित औद्योगिक घटकाने **विनापरवानगी** केला असेल व अन्य शर्तभंग नसतील तर असा विनापरवानगी केलेला वापरातील बदल अशा जमिनीच्या त्या प्रयोजनासाठी प्रचलित वार्षिकदर विवरणापत्रानुसार होणा-या किंमतीच्या **३७.५%** रक्कम एकत्रितात अधिमूल्य म्हणून आकारून नियमित करण्यात यावा. तसेच अशा जमिनीबाबत

वापरातील बदलासह अन्य स्वरूपाचे शर्तभंग असल्यास असे अन्य शर्तभंग प्रथमत: **प्रचलित तरतूदींप्रमाणे** नियमित करून तद्नंतरच वरील प्रमाणे वापरातील बदल नियमित करण्यात यावा.

**२.५ (अ)** औद्योगिक घटकांना औद्योगिक प्रयोजनासाठी **भाडेपट्ट्याने** प्रदान केलेल्या शासकीय जमिनींच्या वापराच्या प्रयोजनात बदल करून अशा जमिनीच्या **निवासी/वाणिज्यिक** प्रयोजनासाठीच्या वापरास परवानगी देतांना अशा जमिनीच्या त्या प्रयोजनासाठीच्या प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रानुसार येणा-या किमतीच्या **२५%** इतकी रक्कम 'अधिमूल्य' म्हणून वसूल करून अशा वापरातील बदलास परवानगी देण्यात यावी, तसेच बदललेल्या प्रयोजनासाठी **प्रचलित धोरणानुसार भुईभाडे आकारण्यात यावे**. मात्र अशा वापरातील बदल संबंधित औद्योगिक घटकाने **विनापरवानगी** केला असेल व अन्य शर्तभंग नसतील तर असा विनापरवानगी केलेला वापरातील बदल अशा जमिनीच्या त्या प्रयोजनाच्या प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रानुसार येणा-या किमतीच्या **३७.५%** इतकी रक्कम एकत्रितात अधिमूल्य म्हणून वसूल करून नियमित करण्यात यावा तसेच बदललेल्या प्रयोजनासाठी **प्रचलित धोरणानुसार भुईभाडे आकारण्यात यावे.** त्याचप्रमाणे अशा जमिनीबाबत वापरातील बदलासह अन्य स्वरूपाचे शर्तभंग असल्यास असे अन्य शर्तभंग प्रथमत: **प्रचलित तरतूदींप्रमाणे** नियमित करून तद्नंतरच वरीलप्रमाणे वापरातील बदल नियमित करण्यात यावा.

**(ब)** औद्योगिक घटकांना औद्योगिक प्रयोजनासाठी **भाडेपट्टयाने** प्रदान केलेल्या शासकीय जमिनींच्या वापराच्या प्रयोजनात बदल करून अशा जमिनीच्या **शैक्षणिक किंवा रुग्णालय विषयक किंवा अन्य धर्मादाय प्रयोजनासाठीच्या** वापरास परवानगी देतांना अशा जमिनीच्या त्या प्रयोजनासाठीच्या प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रानुसार येणा-या किमतीच्या **१२.५%** इतकी रक्कम "अधिमूल्य" म्हणून वसूल करून अशा वापरातील बदलास परवानगी देण्यात यावी, तसेच बदललेल्या प्रयोजनासाठी **प्रचलित धोरणानुसार भुईभाडे** आकारण्यात यावे. मात्र, असा वापरातील बदल संबंधित औद्योगिक घटकाने **विनापरवानगी** केला असेल व अन्य शर्तभंग नसतील तर असा विनापरवानगी केलेला वापरातील बदल अशा जमिनीच्या त्या प्रयोजनाच्या प्रचलित वार्षिक दर विवरणपत्रानुसार येणा-या किंमतीच्या **२५ %** इतकी रक्कम एकत्रितात अधिमूल्य म्हणून वसूल करून नियमित करण्यात यावा तसेच बदललेल्या प्रयोजनासाठी **प्रचलित धोरणानुसार भुईभाडे** आकारण्यात यावे. त्याचप्रमाणे अशा जमिनीबाबत वापरातील बदलासह अन्य स्वरूपाचे शर्तभंग असल्यास असे अन्य शर्तभंग प्रथमत: प्रचलित तरतूदींप्रमाणे नियमित करून तद्नंतरच वरीलप्रमाणे वापरातील बदल नियमित करण्यात यावा.

२.६ मूळ वापराऐवजी अन्य वापरास किंवा वापराच्या बदलास परवानगी देताना संबंधित शासकीय जमीन प्रदानाच्या मूळ आदेशातील इतर अटी व शर्ती कायम राहतील. तसेच, अशा जमिनी **भोगवटादार वर्ग-२ अथवा भाडेपट्टयाने** प्रदान केल्या असतील तर **त्याच धारणाधिकाराच्या** राहतील.

२.७ औद्योगिक प्रयोजनार्थ प्रदान केलेल्या शासकीय जमिनीचा वापर शैक्षणिक किंवा रुग्णालय विषयक किंवा अन्य धर्मादाय प्रयोजनासह रहिवासी/वाणिज्यिक प्रयोजनार्थ संमिश्र स्वरूपात करावयाचा असेल तर, त्या ठिकाणी संबंधित भूखंडाच्या एकूण बांधकाम क्षेत्रापैकी अनुक्रमे शैक्षणिक/रूग्णालय विषयक किंवा अन्य धर्मादाय वापराच्या क्षेत्राचे किंवा रहिवासी/वाणिज्यिक क्षेत्राचे जे प्रमाण असेल, त्याच प्रमाणात भूखंड क्षेत्रावर अनुक्रमे शैक्षणिक/रूग्णालय विषयक किंवा अन्य धर्मादाय वापरापोटी किंवा रहिवासी/वाणिज्यिक वापरापोटी देय “अधिमूल्य” या शासन निर्णय मध्ये विहीत केलेल्या दराप्रमाणे आकारणे आवश्यक राहील.

२.८ औद्योगिक घटकांना औद्योगिक प्रयोजनार्थ प्रदान केलेल्या जमिनीच्या वापरातील बदलापोटी जर प्रचलित विकास नियंत्रण नियमावलीतील तरतूदीनुसार ही शासनास काही अधिमूल्य देय असेल किंवा अशी जमीन तत्कालीन नागरी जमीन कमाल धारणा अधिनियमांतर्गत कलम २० खालील सूट प्राप्त जमीन असेल आणि त्या कारणास्तव ही शासनाच्या प्रचलित धोरणानुसार काही “अधिमूल्य ”अशा वापरातील बदलापोटी शासनाच्या नगर विकास विभागास देय असेल, तर अशा रक्कमां महसूल विभागास प्रस्तुत धोरणात्मक दिशा निर्देशांच्या अनुषंगाने देय रकमेतून समायोजित करण्यात याव्यात.

२.९ सदरहू शासन निर्णयान्वये विहित केलेल्या धोरणानुसार विशिष्ट प्रयोजनासाठी मंजूर केलेल्या शासकीय जमिनीचा (नझूल जमिनी वगळून) मंजूर प्रयोजनाऐवजी अन्य प्रयोजनासाठी वापर करण्यास परवानगी देण्यासंबंधीच्या मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण क्षेत्रातील प्रस्तावांना **शासनाची मान्यता** घेणे आवश्यक राहील. तसेच मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण क्षेत्र वगळता उर्वरित क्षेत्रातील अशा प्रस्तावांना मान्यता देण्याचे अधिकार **विभागीय आयुक्तांना** राहतील.

०४. सदरचे धोरण औद्योगिक घटकांना भुसंपादन कायदयान्वये संपादित करुन दिलेल्या जमिनींना लागू असणार नाही. त्या साठी संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेले धोरण सध्यस्थितीत लागू आहे.

०५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४८८/व्यय-९/२०१९, दि.०५ जानेवारी,२०१९ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१८१११६४९१८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manu kumar srivastava

Digitally signed by Manu kumar srivastava
DN: cn=Manu kumar srivastava, o, ou=goverment of maharashtra, email=smanukr@ias.nic.in, c=IN
Date: 2019.02.18 18:32:24 +05'30'

**(मनु कुमार श्रीवास्तव)**
**अपर मुख्य सचिव ( महसूल, मुद्रांक शुल्क व नोंदणी )**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव, (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग मंत्रालय मुंबई.
१०) प्रधान सचिव , शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय मुंबई.
११) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
१४) प्रधान सचिव, (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) प्रधान सचिव (वने व भूसंपादन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) अपर मुख्य सचिव (महसूल, मुद्रांक शुल्क व नोंदणी), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
१९) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
२०) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे.
२१) नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
२३) धर्मादाय आयुक्त, धर्मादाय आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,मुंबई
२४) सर्व विभागीय आयुक्त.

२५) सर्व जिल्हाधिकारी.

२६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

२७) निवासी लेखाधिकारी, मुंबई.

२८) सर्व सहसचिव / उपसचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

२९) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.

३०) सर्व "ज" समूह कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

३१) निवड नस्ती (कार्यासन ज-१)

******